**अभियोग संचालनालयाच्या आस्थापनेवरील महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत लिपिक-टंकलेखक पदावरील उमेदवारांकरिता स्वतंत्र ज्येष्ठता यादी आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार वगळता क्षेत्रिय कार्यालयातील अन्य लिपिक-टंकलेखक उमेदवारांकरिता स्वतंत्र राज्य स्तरिय सेवा ज्येष्ठता यादी ठेवण्यात.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- डीपीपी-२०१३/प्र.क्र.९१/पोल-१०,**
२ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-** १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एसपीपी-२२९५/प्र.क्र.१४९/ पोल-१०, दिनांक २०.०५.१९९७
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एसपीपी-२००३/प्र.क्र.१४८/ पोल-१०, दिनांक ०४.०६.२००५, २२.०६.२००५ व ०५.१०.२००५
३) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एसपीपी-२००३/प्र.क्र.१४८/ पोल-१०, दिनांक ०७.०२.२००६
४) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एमआयएस-२००३/प्र.क्र.१४८/ पोल-१०, दिनांक १२.१०.२०१०
५) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक आरटीआर-१००२/प्र.क्र.२/०२/१४-अ, दिनांक ३१.०५.२००६
६) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक आरटीआर-२०१४/प्र.क्र.३५५/१२, दिनांक ०६.०६.२०१७

**प्रस्तावना :-**

श्री. पोपट संपत कोकरे, लिपिक-टंकलेखक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत लिपिक-टंकलेखक संवर्गीय पदांची स्वतंत्र ज्येष्ठता सूची ठेवण्याबाबत मुळ अर्ज क्रमांक ७३०/२०१५ दाखल केला होता. सदर मूळ अर्जाच्या अनुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक ३१.०१.२०१७ रोजी पारित केलेले आदेश, तसेच लिपिक-टंकलेखक पदाच्या भरतीबाबत असलेले प्रचलित सेवाप्रवेश नियम विचारात घेऊन अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत लिपिक-टंकलेखक संवर्गीय पदांसाठी स्वतंत्र ज्येष्ठता यादी आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार वगळता क्षेत्रिय कार्यालयातील अन्य लिपिक-टंकलेखक उमेदवारांकरिता स्वतंत्र राज्य स्तरिय ज्येष्ठता यादी ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या पार्श्वभूमीवर संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील लिपिक-टंकलेखक संवर्गाची ज्येष्ठता सूची ठेवण्याची कार्यवाही कशा प्रकारे करावी याबाबत पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

१. संचालक,अभियोग संचालनालयाच्या आस्थापनेवरील बृहन्मुंबई विभागातील (मुख्यालय, उप संचालक, कोंकण परिक्षेत्र, मुंबई व सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, बृहन्मुंबई) या कार्यालयांतील महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत लिपिक-टंकलेखक पदावरील उमेदवारांची स्वतंत्र ज्येष्ठता यादी आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार वगळता क्षेत्रिय कार्यालयातील अन्य लिपिक-टंकलेखक उमेदवारांकरिता स्वतंत्र राज्य स्तरिय ज्येष्ठता यादी ठेवण्यात यावी.

२. संचालक, अभियोग संचालनालय यांच्या अधिपत्याखाली लिपिक-टंकलेखक संवर्गात एकूण ३०५ पदे मंजूर आहेत. या पदांपैकी बृहन्मुंबई विभागातील लिपिक-टंकलेखक २८ (रोखपाल पदासह) व बृहन्मुंबई वगळता उर्वरित महाराष्ट्रातील लिपिक-टंकलेखक २७७ अशी पदसंख्या संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयाद्वारे मंजूर आकृतीबंधानुसार निश्चित करण्यात आलेली आहे. त्यानुसार या दोन्ही संवर्गांकरिता स्वतंत्र बिंदू नामावल्या व स्वतंत्र सेवा ज्येष्ठता सूची ठेवण्यात याव्यात.

३. बृहन्मुंबई विभागातील महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांकरिता शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ३१.०५.२००६ अन्वये बृहन्मुंबई शासकीय कार्यालयातील लिपिक-टंकलेखक (गट-क)(सेवाप्रवेश) नियम २००६ नुसार कार्यवाही करण्यात यावी. तर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार वगळता लिपिक-टंकलेखक संवर्गातील अन्य पदांकरिता शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०६.०६.२०१७ अन्वये विहित करण्यात आलेले सेवा प्रवेश नियम अंगिकारण्यात यावेत.

४. अभियोग संचालनालयाच्या आस्थापनेवर वरिष्ठ लिपिक संवर्गातील एकूण ४३ पदे मंजूर आहेत. महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत लिपिक-टंकलेखक संवर्गातून बृहन्मुंबई विभागातील वरिष्ठ लिपिक पदावरील पदोन्नतीकरिता ६ पदे राखीव ठेवण्यात यावीत. मात्र शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ३१.०५.२००६ नुसार बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयामधील लिपिक-टंकलेखक (गट-क) (सेवाप्रवेश) नियम-२००६ नुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांव्यतिरिक्त इतर उमेदवारांना उर्वरित महाराष्ट्रात पदोन्नतीच्या द्विस्तरीय संधी (उदा. शिपाई - लिपिक टंकलेखक व लिपिक-टंकलेखक - वरिष्ठ लिपिक) उपलब्ध असतील. त्यानुसार उर्वरित महाराष्ट्रातील लिपिक-टंकलेखकांना वरिष्ठ लिपिकाच्या ३७ मंजूर पदांवर त्या-त्या संवर्गातून स्वतंत्र पदोन्नती देण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी. याकरिता दोन्ही संवर्गांच्या स्वतंत्र बिंदूनामावल्या व ज्येष्ठता सूची ठेवण्यात याव्यात.

५. वरिष्ठ लिपिक पदास निकटतम ज्येष्ठ असलेल्या "अधीक्षक" या पदावरील पदोन्नतीकरिता बृहन्मुंबई विभागातील वरिष्ठ लिपिकांची व उर्वरित महाराष्ट्रातील वरिष्ठ लिपिकांची सामाईक / एकत्रित ज्येष्ठता सूची ठेवण्यात यावी. मात्र, बृहन्मुंबई क्षेत्रातील वरिष्ठ लिपिकांच्या बदल्या या बृहन्मुंबई क्षेत्रापुरत्या मर्यादित ठेवण्यात याव्यात व बृहन्मुंबई वगळता उर्वरित महाराष्ट्रातील वरिष्ठ लिपिकांच्या बदल्या उर्वरित महाराष्ट्राच्या क्षेत्रापुरत्या मर्यादित

ठेवण्यात याव्यात. त्याअनुषंगाने वरिष्ठ लिपिक पदाच्या पुढील पदोन्नतीकरिता व बदलीकरिता दोन स्वतंत्र ज्येष्ठता सूच्या ठेवण्यात याव्यात.

हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६४९/२०१७, दिनांक ०६.०६.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संकेतांक २०१८१०२४१६०४४७५७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.10.24 16:11:19 +05'30'

**(किशोर शामराव भालेराव)**
**उप सचिव (विधि), गृह विभाग,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
२. संचालक, अभियोग संचालनालय, खेतान भवन, ५ वा मजला, सदनिका क्रमांक ८, जे. टाटा मार्ग, चर्चगेट, मुंबई ४०० ०२१.
३. सर्व उप संचालक, अभियोग संचालनालय
४. सर्व सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/ पोल-१०